**महाराष्ट्र राज्यातील साखर कारखाना कामगारांच्या प्रश्नांबाबत दिनांक ०४.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत समितीस अहवाल सादर करण्याकरिता मुदतवाढ देण्याबाबत तसेच सदर समितीचे अध्यक्ष घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०२१/प्र.क्र.२९/कामगार-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १६.१२.२०२१

वाचा-

१. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. संकीर्ण -२०१९/प्र. क्र.४८/ काम-३, दिनांक १२.११.२०२०.
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. संकीर्ण -२०२१/प्र. क्र. २९/ काम-३, दिनांक ०४.०३.२०२१
३. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. संकीर्ण -२०२१/प्र. क्र.२९/ काम-३, दिनांक ०७.०७.२०२१
४ कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.काआ/औसं/मुदतवाढ/२०२१/कार्या-८/ मं८३७, दि.२६.११.२०२१

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र राज्यातील साखर कारखान्यातील कामगारांच्या वेतन व सेवाशर्ती याबाबत दि.१२.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत त्रिपक्षीय समितीस आणि शासनास शिफारस करणे/उपाययोजना सुचविण्यासाठी दि.०४.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये चार सदस्य असलेली समिती गठीत करण्यात आलेली आहे. या समितीच्या शासन निर्णयामध्ये सदर समितीचा अध्यक्ष कोण याबाबतची तरतुद करण्यात आलेली नव्हती. सदर समितीचा कालावधी हा प्रथम ०३ महिन्यांचा होता. सदर कालावधी दि.०३.०६.२०२१ रोजी संपुष्टात आला असल्याने दि.०७.०७.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर कालावधी दि.०४.०६.२०२१ पासून पुढे ०६ महिन्यांसाठी अर्थात दि.०३.१२.२०२१ पर्यंत वाढविण्यात आला होता. या समितीच्या दि.०६.०५.२०२१ व दि.१७.०५.२०२१ रोजी बैठका झाल्या असून कोव्हिड काळातील प्रतिबंध व इतर प्रशासकिय व्यस्ततेमुळे सदर समितीच्या बैठका होऊ शकल्या नाही. सबब, समितीची कार्यवाही पूर्ण झालेली नाही. सद्यस्थितीत समितीची कार्यवाही सुरू असून सदर समितीचा कालावधी दि.०४.१२.२०२१ पासून आणखी ६ महिन्यांसाठी वाढविण्याची विनंती कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी केली आहे. त्यानुषंगाने सदर समितीच्या अध्यक्षांची घोषणा करण्याची तसेच सदर समितीस दि.०४.१२.२०२१ पासून पुढे ०६ महिन्यांची मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र राज्यातील साखर कारखाना कामगारांच्या मागण्यांबाबत शासनास आणि दिनांक १२.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत त्रिपक्षीय समितीस शिफारस करणे/उपाययोजना सुचविण्याकरिता दिनांक ०४.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत समितीस अहवाल सादर करण्याकरिता दिनांक ०४.१२.२०२१ पासून ६ महिन्यांची मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच, सदर समितीमध्ये सदस्य म्हणून कार्यरत असलेले साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सदर समितीचे अध्यक्ष म्हणून घोषित करण्यात येत आहे. दिनांक ०४.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील इतर तरतुदी कायम राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१६१५०६४३१११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAGUNA GANESH THENGIL

Digitally signed by SAGUNA GANESH THENGIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d46fe3bd37ed57f0bdb52fb3a029adc135025943cb93cc90de6ceb564ced5ea3, pseudonym=E1C179DBCBC6C6E9A930E278944519A63E3712DA, serialNumber=8B4022592C04665617981351F8579C9ABD8539AE93768B3FF96B29E67B146A80, cn=SAGUNA GANESH THENGIL
Date: 2021.12.16 15:08:02 +05'30'

**( सगुणा काळे-ठेंगील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
४. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
५. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
६. मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
७. मा. प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. मा. प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य साखर कारखाना संघ, मर्या., साखर भवन, मुंबई.
१२. कल्याण आयुक्त, कामगार कल्याण मंडळ, मुंबई.
१३. कामगार उपायुक्त (औ. सं.), मुंबई.
१४. अपर कामगार आयुक्त (मैत्री कक्ष), मुंबई
१५. महालेखापाल (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
१६. महालेखापाल (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.
१७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१९. वित्त विभाग (व्यय व अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई.
२०. निवडनस्ती (काम-३).